२०१५०४२३१५२३५२९४२७

(२५८)

फोफेरी खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(४५३/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ९/०३/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/फोफेरी/ तां-२(१) ७४२९, दि.१९/१०/२०१०

प्रस्तावना :-

फोफेरी खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकुण लांबी ३१२० मी. असून त्यावर सा.क्र.११८ मी. वर एका उघाडीचा समावेश आहे. सदरची उघाडी नादुरुस्त आहे. समुद्राच्या नियमित येणाऱ्या भरती व लाटेमुळे बांध सखल व कमकुवत झाला आहे. तसेच योजनेची संबंधित उघाडी पूर्णपणे खराब झाली आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये फोफेरी खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित रू.२,३८,७१,२९७/- (रुपये दोन कोटी, अडतीस लक्ष, एकाहत्तर हजार, दोनशे सत्त्याण्णव फक्त) यापैकी रू.२,१७,०१,१७९/- कामाप्रित्यर्थ व रू.२१,७०,११८/- अनुषंगिक खर्च रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे (योजनांतर्गत)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एफीएच १०७३/३२६५३/ई(३), दि.२६.६.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००७/प्र.क्र.४२/०७ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (१५/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यासह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(४५३/२०१०) खारभूमी दिनांक ९/०३/२०११ चे सहपत्र
फोफेरी खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ८७९६४ |
| २ | 'बी' भूसंपादन | ० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | १७६६४८९७ |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | ३७००११४ |
| ५ | 'के' इमारती | ० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | १२०८९७ |
| ७ | 'ओ' संकीर्ण | २५००० |
| ८ | 'पी' देखभाल | ५३४१३ |
| ९ | 'आर' दळणवळण | ४८८९४ |
| | एकूण | २१७०११७९ |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | २१७०११८ |
| | एकूण | २,३८,७१,२९७ |

<u>ठळक वैशिष्टये</u>

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | १९९ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ११९९५६ |
| लाभव्यय गुणोत्तर | २.९३ |